**उस्मानाबाद जिल्ह्यामधील दुष्काळग्रस्त भागातील पशुधनाकरीता सुरू करण्यात आलेली पशुधन राहत व चारा शिबीरे (कॅटल रिलीफ ॲण्ड फॉडर कॅम्प) दिनांक १ ऑक्टोबर, २०१९ पासून दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१९ पर्यंत सुरू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- पविआ-१०१९/प्र.क्र.१६७/पदुम-३**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक:- ७ ऑक्टोबर, २०१९**

<u>वाचा</u> :- (१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एससीवाय-२०१८/प्र.क्र.८९/म-७, दिनांक ३१.१०.२०१८

(२) कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्र. पविआ-१०१९/प्र.क्र.१७/पदुम-३, दिनांक ०९.०१.२०१९.

(३) कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्र. पविआ-१०१९/प्र.क्र.४९/पदुम-३, दिनांक ०६.०२.२०१९.

(४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एससीवाय - २०१९/प्र.क्र.३० /म-७, दिनांक ३०.०८.२०१९

(५) कृषि व पदुम विभाग, शासन आदेश क्र. पविआ-१०१९/प्र.क्र.१६७/पदुम-३, दिनांक ०५.०९.२०१९

(६) महसूल व वन विभागाचे क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.३०/म-७, दिनांक १ ऑक्टोबर, २०१९ रोजीचे पत्र.

<u>प्रस्तावना-</u>

दुष्काळ व्यवस्थापन संहिता, २०१६ मधील कार्यपध्दतीनुसार वाचा-१ येथील दिनांक ३१.१०.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये, सन २०१८ च्या खरीप हंगामामध्ये राज्यातील दुष्काळी तालुके घोषित करण्यात आलेले आहेत.

२. तसेच, दुष्काळी कालावधी करीता तातडीने उपाययोजना सुचविण्यासाठी / सनियंत्रण ठेवण्यासाठी / निर्णय घेण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीने यापूर्वी मराठवाड्यातील तीव्र दुष्काळग्रस्त जिल्ह्यामध्ये **गोवर्धन गोवंश सेवा केंद्र** या योजनेंतर्गत ज्या गोशाळांना रु. १.०० कोटीचे अनुदानासाठी निवड करण्यात आलेली आहे किंवा अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे, अशा गोशाळांमध्ये प्रायोगिक तत्वावर त्या परिसरातील पशुधनासाठी **पशुधन राहत व चारा शिबीर (कॅटल रिलीफ ॲण्ड फॉडर कॅम्प)** तात्काळ प्रभावाने सुरू करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार वाचा क्र. २ व ३ येथील अनुक्रमे दिनांक ०९.०१.२०१९ व ०६.०२.२०१९ रोजी आदेश निर्गमीत करण्यात आलेले आहेत.

३. उस्मानाबाद जिल्ह्यातील भगवंत बहुउद्देशीय संस्था, औरंगाबाद संचलित गोशाळा, मौजे. हाडोंग्री, ता. भूम, जि. उस्मानाबाद व श्री. येडेश्वरी गुरूकुलम गोशाळा, दुधाळवाडी, येरमाळा, ता. कळंब, जि. उस्मानाबाद या गोशाळांमार्फत चालविण्यात येत असलेली पशुधन राहत व चारा शिबीरे वाचा क्र. ५ येथील दिनांक ०५.०९.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ३०.०९.२०१९ पर्यंत सुरू ठेवण्यात मान्यता देण्यात आली होती.

४. राज्यातील दुष्काळी भागात सुरू असलेल्या चारा छावण्या दिनांक ३० सप्टेंबर, २०१९ पर्यंत सुरू ठेवण्याबाबत महसूल व वन विभागाने वाचा क्र. ४ येथील दिनांक ३०.०८.२०१९ रोजी शासन निर्णय निर्गमित केला आहे. सदर शासन निर्णयान्वये सन २०१९ मधील मान्सूनचे विलंबाने झालेले आगमन विचारात घेऊन, पशुधनासाठी चारा उपलब्ध होण्याकरीता काही कालावधी लागणार असल्याने, राज्यात दुष्काळी भागात पशुधनास चारा व पाणी उपलब्ध होण्यासाठी सुरू करण्यात आलेल्या चारा छावण्यांची मुदत दिनांक ३० सप्टेंबर, २०१९ पर्यंत वाढविण्यास मान्यता दिलेली आहे. आता, महसूल व वन विभागाने दिनांक ०१.१०.२०१९ रोजीच्या पत्रान्वये जिल्हाधिकारी, उस्मानाबाद यांना उस्मानाबाद जिल्ह्यातील चारा छावण्यांना दिनांक ३१.१०.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली असून, जनावरांच्या छावण्यासंदर्भात पूर्वीच्या अटी व शर्ती कायम राहतील, असे कळविले आहे.

५. तसेच जिल्हाधिकारी, उस्मानाबाद यांनी दिनांक ३०.०८.२०१९ रोजीच्या पत्रान्वये उस्मानाबाद जिल्ह्यात पुरेसा चारा उपलब्ध होईपर्यंतच्या कालावधीसाठी उक्त पशुधन राहत व चारा शिबीरास मुदतवाढ देण्याबाबत अहवाल, सादर केलेला आहे.

६. महसूल व वन विभागाने वाचा क्र. ६ येथील दिनांक ०१.१०.२०१९ रोजी निर्गमित केलेले पत्र आणि जिल्हाधिकारी, उस्मानाबाद यांचे दिनांक ३०.०८.२०१९ रोजीचा अहवाल विचारात घेता, उस्मानाबाद जिल्ह्यामधील दुष्काळग्रस्त भागातील पशुधनाकरीता सुरू करण्यात आलेली पशुधन राहत व चारा शिबीरे दिनांक १ ऑक्टोबर, २०१९ ते दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१९ कालावधीपर्यंत सुरू ठेवण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

७. सन २०१९ मधील मान्सूनचे विलंबाने झालेले आगमन विचारात घेऊन, पशुधनासाठी चारा उपलब्ध होण्यासाठी काली कालावधी लागणार असल्याने राज्यात दुष्काळी भागात पशुधनांना चारा व पाणी उपलब्ध होण्यासाठी उस्मानाबाद जिल्ह्यात भगवंत बहुउद्देशीय संस्था, औरंगाबाद संचलित गोशाळा, मौजे. हाडोंग्री, ता. भूम, जि. उस्मानाबाद व श्री. येडेश्वरी गुरूकुलम गोशाळा, दुधाळवाडी, येरमाळा, ता. कळंब, जि. उस्मानाबाद या संस्थांमार्फत सुरू करण्यात आलेली पशुधन राहत व चारा शिबीरे दिनांक १ ऑक्टोबर, २०१९ ते दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१९ सुरू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१९१००७१६५२००५४२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=406cb152e109154a7466c0050f88e5a437e17838973824687653a5e8d144b72b, ou=AGRI AND ADF DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2019.10.07 16:52:28 +05'30'

**( विकास तु. कदम )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे- ७.
३. जिल्हाधिकारी, उस्मानाबाद
४. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, लातूर
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / उस्मानाबाद
६. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
७. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त,
९. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र- २, नागपूर.
११.महसूल व वन विभाग (म-७), मंत्रालय, मुंबई-३२.
१२.अध्यक्ष/सचिव, भगवंत बहुउद्देशीय संस्था, औरंगाबाद संचलित गोशाळा, मौजे. हाडोंग्री, ता. भूम, जि. उस्मानाबाद.
१३.अध्यक्ष/सचिव, श्री. येडेश्वरी गुरूकुलम गोशाळा, दुधाळवाडी, येरमाळा, ता. कळंब, जि. उस्मानाबाद.
१४.निवड नस्ती (पदुम- ३)